**ग्रामपचांयतीमध्ये दिनांक २५ जानेवारी रोजी राष्ट्रीय मतदार दिन राबविण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

शासन परिपत्रक क्रमांकः ग्रापंनि २०२१/प्र.क्र.१२८/पं.रा.-२

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ मंत्रालय, मुंबई ४०० ००१.

तारीख: २३ डिसेंबर, २०२१

**वाचा** :- १. ग्राम विकास विभागाचे परिपत्रक क्र. संकिर्ण २०२१/प्र.क्र.९८/पं.रा.-२, दिनांक २५ ऑक्टोंबर, २०२१.

२. प्रधान सचिव तथा मुख्य निवडणूक अधिकारी यांचे अर्धशासकीय पत्र क्र. संकिर्ण २०२१/प्र.क्र. ८००/२१/३३, दिनांक २० डिसेंबर, २०२१.

**परिपत्रक :-**

दिनांक २५ जानेवारी, १९५० रोजी भारत निवडणूक आयोगाची स्थापना झाली. भारत निवडणूक आयोगाचा हा स्थापना दिवस २०११ पासून संपूर्ण देशभरात “राष्ट्रीय मतदार दिन” म्हणून साजरा केला जातो. राष्ट्रीय मतदार दिन साजरा करण्याचा मुख्य उद्देश हा मतदारांना, विशेषत: नवमतदारांना मतदार यादीत नाव नोंदणीसाठी प्रोत्साहन देणे, सुलभरीत्या त्यांची नाव नोंदणी करुन घेणे, हा आहे. देशातील मतदारांना समर्पित केलेल्या दिवसाचा उपयोग मतदारांचा निवडणूक प्रक्रियेतील सहभाग वाढावा म्हणून त्यांना जागरूक करण्यासाठी केला जातो. राष्ट्रीय मतदार दिनाच्या कार्यक्रमात नवमतदारांचा सत्कार करुन त्यांना मतदार ओळखपत्र दिले जाते.

या पार्श्वभुमीवर राष्ट्रीय मतदार दिनाचे महत्व समाजात रुजावे यासाठी राज्यातील सर्व ग्रामपंचायतींनी २५ जानेवारी रोजी राष्ट्रीय मतदार दिन दरवर्षी अनिवार्यपणे साजरा करण्यात यावा. सदर दिवशी पुढीलप्रमाणे कार्यक्रमाचे आयोजन करण्यात यावे:

- या दिवशी गावातील महत्वाच्या ठिकाणी राष्ट्रीय मतदान दिनाच्या शुभेच्छा देणारा बॅनर/फ्लेक्स लावावा.

- गावकऱ्यांमध्ये, विशेषत: नवमतदारामध्ये मताधिकार, निवडणूक, लोकशाही याविषयी जाणीव-जागृती निर्माण करण्यासाठी सदर दिनाचे महत्त्व सांगावे.

- सदर दिवशी वातावरणनिर्मिती व्हावी म्हणून मताधिकार, लोकशाही यांसंबंधी रांगोळी काढावी.
- गावकऱ्यांसोबत लोकशाहीवर निष्ठा ठेवण्यासंबंधी शपथ घेण्याचा कार्यकम घेण्यात यावा. (मराठी, हिंदी आणि इंग्रजी भाषांतील शपथेचा नमुना सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये देण्यात आलेला आहे.)
- ज्यांनी नियमितपणे मताधिकार बजाविले आहे अशा जेष्ठ मतदारांचा सत्कार करावा.

सदर कार्यक्रम साजरा करताना कोव्हीड -१९ संबंधी शासनाच्या नियमांचे पालन करण्यात यावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२३१६०२२९९४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANGESH MOHITE

Digitally signed by MANGESH MOHITE
DN: cn=MANGESH MOHITE, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou=GOVT OF MAHARASHTRA, email=SOPR2.RDD-MH@NIC.IN, c=IN
Date: 2021.12.23 17:49:29 +05'30'

**मंगेश मोहिते (भाप्रसे)**
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल महोदय यांचे खाजगी सचिव,

२. मा. प्रधान सचिव तथा मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई

३. जिल्हा निवडणूक अधिकारी, सर्व जिल्हे.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व.

५. निवडनस्ती (पंचायत राज-२)

## परिशिष्ट

राष्ट्रीय मतदार दिवस

मतदारांसाठी प्रतिज्ञा

### मराठी

"आम्ही, भारताचे नागरिक, लोकशाहीवर निष्ठा ठेवून, याव्दारे, प्रतिज्ञा करतो की, आपल्या देशाच्या लोकशाही परपरांचे जतन करू आणि मुक्त नि:पक्षपाती व शांततापूर्ण वातावरणातील निवडणूकांचे पावित्र्य राखू व प्रत्येक निवडणूकीत निर्भयपणे तसेच धर्म, वंश, जात, समाज, भाषा यांच्या विचारांच्या प्रभावाखाली न येता किंवा कोणत्याही प्रलोभनास बळी न पडता मतदान करू."

### हिंदी

"हम, भारत के नागरिक, लोकतंत्र मे, अपनी पूर्ण आस्था रखते हुए यह शपथ लेते है की हम अपने देश की लोकतांत्रिक परंपराओंकी मर्यादा को बनाए रखेंगे तथा स्वतंत्र, निष्पक्ष एवं शांतिपूर्ण निर्वाचन की गरिमा को अक्षुण्ण रखते हुए, निर्भीक होकर, धर्म, वर्ग, जाति, समुदाय, भाषा अथ्वा अन्य किसी भी प्रलोभन से प्रभावित हुए बिना निर्वाचनो मे अपने मताधिकार का प्रयोग करेंगे"

### English

"We, the citizens of India, having abiding faith in democracy, hereby pledge to uphold the democratic traditions of our country and the dignity of free, fair and peaceful elections and to vote in every election fearlessly and without being influenced by considerations of religion, race, caste, language or any inducement."